**सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता पारधी विकास कार्यक्रमांसाठी अर्थसंकल्पीत रु.१७२५.०० लक्ष इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :-पारधी २०१४/प्र.क्र.९१/का.१७**

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

दिनांक : ३१ मार्च, २०१५

**वाचा:** आयुक्त, आदिवासी विकास, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र. विकास २०१३/प्रक्र.९२/का-३(४), दिनांक ३० सप्टेंबर, २०१३.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमातीच्या सर्वांगिण विकासाची जबाबदारी राज्य शासनाची आहे. महाराष्ट्र एकूण ४५ आदिवासी जमाती असून राज्य शासनाच्या अनुसूचित जमातीच्या यादीमधील अनुक्रमांक ३८ वर पारधी समाजाची नोंद घेण्यात आली आहे. आदिवासींसाठी असलेल्या सर्व योजना या पारधी समाजासाठी सुध्दा लागू आहेत. पारधी जमात आदिवासी जमातीप्रमाणे शैक्षणिक , सामाजिक व आर्थिकदृष्टया अत्यंत मागासलेली जमात आहे. पारधी समाजाच्या लोकांना राहण्यासाठी घर नाही, उदरनिर्वाहाचे साधन म्हणून व्यवसाय नाही. त्यामुळे पारधी विकास कार्यक्रमातर्गत समाजाच्या सर्वांगिण विकासासाठी यांच्या घरकुलांचा व पारधी समाजाच्या सुशिक्षित बेरोजगार युवकांच्या आवडीनुसार त्यांना व्यवसाय प्रशिक्षण व त्यानुसार व्यवसायासाठी अर्थसहाय उपलब्ध करुन देणे या योजना स्वतंत्रपणे राबविणेबाबत आयुक्त, आदिवासी विकास, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी त्यांच्या दिनांक ३० सप्टेंबर, २०१३च्या पत्रान्वये प्रस्तावित केलेल्या रु. ४३२४.७५ लक्ष इतक्या रकमेच्या विविध योजनापैकी अर्थसंकल्पीत रु.२३००.०० लक्ष रकमेच्या मर्यादेत सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता पारधी विकास कार्यक्रमाकरीता रु.२३००.०० लक्ष इतक्या अर्थसंकल्पीत निधीच्या ७५% प्रमाणात रु. १७.२५ कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी उपयोजनेतंर्गत सन २०१४ - १५ या आर्थिक वर्षाकरिता पारधी विकास कार्यक्रमाकरीता रु. २३.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर निधीच्या ७५% प्रमाणात रु. १७.२५ कोटी इतका निधी खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | उपक्रम | योजनेचा उद्देश | लक्षांक | प्रतीनग अपेक्षित खर्च ( रु.लाखात ) | खर्च ( रु.लाखात ) |
|---|---|---|---|---|---|
| 1 | अनुसूचित जमातीच्या विकासासाठी पारधी समाजातील लाभार्थ्यांकरिता घरकुलांचे बांधकाम करणे. | पारधी समाजास एका जागेवर स्थिर स्थावर करुन त्यांचा वैयक्तिक व सामाजिक विकास घडवून आणने, त्यामुळे या समाजास हक्कांचा निवारा उपलब्ध होईल. | 1200 | 1.00 | 1200.00 |
| 2 | दारिद्रय रेषेखालील भूमिहीन पारधी आदिवासी समाजास स्वामिमान सबळीकरण योजनेतर्गत जिरायत / बागाईत जमिन उपलब्ध करुन देणे | उत्पन्नाचे मुख्य साधन म्हणून जिरायत /बागायत जमिन उपलब्ध करुन देणे. | 60 | 5.00 | 300.00 |
| 3 | युवकांना विविध क्षेत्रात रोजगारार्थ कौशल्य विकास प्रशिक्षण | आधुनिक काळात पारंपारीक व्यवसाय तग धरु शकत नाहीत व नविन व्यवसाय देखील जुन्या पध्दतीने चालू शकत नाही त्यामुळे युवकांचे पारंपारीक व्यवसायातील कौशल्य विकसीत करणे व त्यांना व्यवसायाकरीता आधुनिक तंत्रज्ञानावर आधारीत कौशल्य विकास प्रशिक्षण देणे. | 65 | 0.20 | 13.00 |
| 4 | युवकांना व्यवसाय सुरु करण्यासाठी अर्थसहाय्य | | 40 | 0.50 | 20.00 |
| 5 | पारधी वसाहतीमधील शिक्षित/ अशिक्षित/अर्धशिक्षित/शाळाबाहय व्यक्ती/ मुले/मुली यांची सूची तयार करणे.<br>अशिक्षीत/ अर्धशिक्षीत व्यक्तींसाठी शिक्षण तथा प्रशिक्षण वर्ग चालविणे.<br>शाळाबाहय मुलांसाठी शिक्षण तथा प्रशिक्षण वर्ग चालविणे तत्वावर विद्यमान शासकीय आश्रमशाळेत शाळाबाहय /शाळाप्रवेश पात्रा पारधी विद्यार्थ्यांना प्रवेश देणे | शाळाबाहय विद्यार्थ्यांना शिक्षणाच्या प्रवाहात आणणे. | 2000 गावे प्रति गांव 1 वर्ग | प्रति गांव 3 महिन्याकरीता रु. 1000/- मानधन | 20.00 |
| 6 | वर्ग चालविण्यासाठी सुशिक्षित पारधी युवक /युवतींना प्रशिक्षित करणे. | | 1000 गावे प्रति गांव 1 वर्ग | प्रति गांव 6 महिन्याकरीता रु. 15000/- मानधन | 150.00 |
| 7 | पारधी वस्तीमध्ये बालसंस्कार केंद्र/ बालवाडया चालविणे | | 40 | 0.55 | 22.00 |
| | एकूण रक्कम | | | | 1725.00 |

२. या कारणाकरिता होणारा खर्च "मागणी क्रमांक टी-५, मुख्यलेखाशिर्ष- २२२५ -अनुसुचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण ७९६- जनजातीय क्षेत्र उपयोजना- (०१)- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजना अंतर्गत योजना- (०२) (३१) पारधी समाजाच्या विकासाकरिता विविध योजना राबविणे (२२२५-डी १२६ ) ३१ सहायक अनुदाने" (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदरहू रक्कम आयुक्त, आदिवासी विकास, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी संबंधितांना सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केल्याप्रमाणे वितरित करावी.

३. नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवण्यांत आलेली. तरतूद ज्या बाबींसाठी मंजूर करण्यात आली आहे. त्या योजनेवर संपूर्ण खर्च करावी व या योजनेतंर्गत पारधी विकास कार्यक्रमाकरीता परिशिष्ट -अ मध्ये नमूद योजनांकरीता देण्यात आलेल्या अर्थसहाय्याबाबतच्या खर्चाच्या व कामाच्या प्रगतीचा त्रैमासिक अहवाल / उपयोगिता प्रमाणपत्र शासनास वेळोवेळी सादर करावा. निधी वितरीत करतांना विहीत कार्यपध्दती, सर्व वित्तीय नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, CAG चे निदेश, बजेट व कोषागार नियम यांचे पालन करण्यात यावे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्याच्या अनौ. संदर्भ क्रमांक १४५/ व्यय १४,दिनांक २७ मार्च, २०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१५०३३११७५४४२०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DESHMUKH GAJANAN RAMDAS

Digitally signed by DESHMUKH GAJANAN RAMDAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL,CID - 919374, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DESHMUKH GAJANAN RAMDAS
Date: 2015.03.31 21:57:38 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मंत्री/ मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, ठाणे, नागपूर, अमरावती

५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प कार्यालय

६. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

८. वित्त विभाग ( विनियम ) व्यय-१४ ( अर्थसंकल्प-३) मंत्रालय, मुंबई.

९. उप सचिव (श्री. देशपांडे, श्री.मंता, श्री.शिंदे ) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१०.कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग ( का.२ व ६ ), मंत्रालय, मुंबई.

११.निवडनस्ती (का.१७)

## परिशिष्ट "अ"

## आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्रमांक पारधी २०१४/प्र.क्र.९१/का.१७, दि.३१ मार्च, २०१५ चे सहपत्र.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शिर्ष- मागासवर्गीयांचे कल्याण<br>योजनेचं नांव- पारधी समाजाच्या विकासाकरिता विविध योजना<br>(राज्यस्तरीय योजना)<br>(रु. हजारात) | मागणी क्रमांक टी-५<br>मुख्य लेखाशिर्ष : मुख्यलेखाशिर्ष- २२२५ -अनुसुचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण- ७९६- जनजातीय क्षेत्र उपयोजना- (०१)- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजना अंतर्गत योजना- (०२) (३१) पारधी समाजाच्या विकासाकरिता विविध योजना (२२२५-डी १२६ ) (३१ ) सहायक अनुदाने" (वेतनेत्तर) | | | |
| योजनेचे नांव | २०१४-१५ साठी मंजूर तरतूद | २०१४-१५ ची सदरहू तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| अनुसूचित जमातीच्या (पारधी) समाजाच्या लाभार्थ्यांना घरकुल बांधकामासाठी आवश्यक निधी | १२०००० | आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य ,नाशिक | आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | -- |
| दारिद्रय रेषेखालील भूमिहीन पारधी आदिवासी समाजास स्वामिमान सबळीकरण योजनेतर्गत जिरायत / बागाईत जमिन उपलब्ध करुन देणे | ३०००० | | | |
| युवकांना विविध क्षेत्रात रोजगारार्थ कौशल्य विकास प्रशिक्षण | १३०० | | | |
| युवकांना व्यवसाय सुरु करण्यासाठी अर्थसहाय्य | २००० | | | |
| पारधी वसाहतीमधील शिक्षित/ अशिक्षित/अर्धशिक्षित/शाळाबाहय व्यक्ती/ मुले/मुली यांची सूची तयार करणे.<br>अशिक्षीत/ अर्धशिक्षीत व्यक्तींसाठी शिक्षण तथा प्रशिक्षण वर्ग चालविणे.<br>शाळाबाहय मुलांसाठी शिक्षण तथा प्रशिक्षण वर्ग चालविणे तत्वावर विद्यमान शासकीय आश्रमशाळेत | २००० | | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| शाळाबाहय /शाळाप्रवेश पात्रा पारधी विद्यार्थ्यांना प्रवेश देणे | | | | |
| वर्ग चालविण्यासाठी सुशिक्षित पारधी युवक /युवतींना प्रशिक्षित करणे. | १५००० | | | |
| पारधी वस्तीमध्ये बालसंस्कार केंद्र/ बालवाडया चालविणे | २२०० | | | |
| एकूण | १७२५०० | | | |